**शासन सेवेतून सेवानिवृत्त झालेल्या / सेवेत असताना मृत्यू पावलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या शासन सेवेत असलेल्या वारसदारास शासकीय निवासस्थानाचे वाटप करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.शानिवा-१०१०/प्र.क्र.३७४/१०/२३-अ**
**दिनांक : ३० ऑगस्ट २०१०**

**वाचा :-** शासन निर्णय क्र.शानिवा-२५०८/२३/प्र.क्र.३०/०८/२३-अ, दि.२५.३.२००८.

**पार्श्वभूमी :-**

बृहन्मुंबईतील विविध शासकीय कार्यालयामध्ये काम करणाऱ्या अधिकाऱ्यांना / कर्मचाऱ्यांना शासकीय निवासस्थानाचे वाटप केले जाते. असे कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यानंतर त्यांच्या नावे असलेले शासकीय निवासस्थान त्यांच्या कुटुंबातील शासकीय सेवेत असलेल्या व्यक्तीच्या नावे करण्याबाबतच्या तरतूदी दि.२५.३.२००८ च्या निर्णयान्वये मागे घेण्यात आल्या आहेत. बृहन्मुंबईतील विविध शासन कार्यालयातील शासकीय निवासस्थानाचे वाटप केलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीनंतर अशा शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांच्या कुटुंबातील शासन सेवेत असलेल्या वारसदारांना सदर निवासस्थानांचे हस्तांतरण करण्यात येत नाही. त्यामुळे त्यांना शासनाने दिलेल्या मुदतवाढीचा कालावधी संपल्यानंतर शासकीय निवासस्थान रिक्त करावे लागते व त्यामुळे संबंधितांची गैरसोय होते. सदर गैरसोय टाळण्याच्या दृष्टीने याबाबत सांगोपांग विचार करुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निणय :-**

शासन सेवेतून सेवानिवृत्त झालेल्या/ सेवेत असताना मृत्यू पावलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या कुटुंबातील एखादा सदस्य जर शासन सेवेत असेल तर त्या सदस्याने शासकीय निवासस्थान मिळण्यासाठी विहित अर्ज सादर केल्यानंतर अशा अधिकारी/ कर्मचाऱ्यांना त्वरित प्रतिक्षायादीवर

घेण्यात यावे व त्यांना विशेष बाब म्हणून प्राधान्याने अनुज्ञेय शासकीय निवासस्थानाचे वाटप करण्यात यावे."

सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.Maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००८३०२०१७२२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( प्र. या. बैले )**
**उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. उप मुख्यमंत्र्याचे सचिव,
४. मुख्यमंत्री/ उपमुख्यमंत्री/ सर्व मंत्री/ सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई ( ५ प्रती)
६. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (५ प्रती)
७. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई
८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. मुख्य अभियंता, प्रादेशिक (सा.बां.) विभाग, मुंबई, २५, मर्झबान पथ, मुंबई
११. अधिक्षक अभियंता, मुंबई मंडळ, मुंबई
१२. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई
१३. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई, वरळी, मुंबई
१४. कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, अंधेरी (प), मुंबई
१५. सक्षम प्राधिकारी, बृहन्मुंबबई, जुने जकात घर, मुंबई
१६. सचिव, लोकसेवा आयोग, मुंबई
१७. अधिदान व लेखा कार्यालय
१८. बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
१९. सर्व मंत्रालयीन विभाग
२०. सामान्य प्रशासन विभागामधील सर्व कार्यासन
२१. निवडनस्ती.